**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू, यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, डोंगारी ता. तलासरी, जि.ठाणे येथील बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआबां-२०१०/प्र.क्र.१/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :-८ जानेवारी, २०१०.

**वाचा** :- उपविभागीय अभियंता, सा.बां.उपविभाग, तलासरी यांचे जा.क्र./सा.बां./उवित/प्रशा/९१०, दि.१९/१२/२००९ चे पत्र.

**शासन निर्णय :** उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, तलासरी यांनी त्यांच्या दि.१९/१२/२००९ च्या पत्रान्वये शासकीय आश्रमशाळा, डोंगारी ता.तलासरी, जि.ठाणे येथे दोन नवीन वर्ग खोल्यांचे बांधकाम करण्याबाबतचे एकूण रु.५,६५,९४७/- (रु. पाच लाख पासष्ट हजार नऊशे सत्तेचाळीस फक्त) इतक्या रकमेचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू यांच्याकडे सादर केली आहेत.

२. सदर अंदाजपत्रक शाखा अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, तलासरी यांनी तयार केली असून उप विभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, तलासरी यांनी तपासली व साक्षांकित केली आहेत.

३. उपरोक्त शासकीय आश्रमशाळेचे अंदाजपत्रक सन २००९-१० दरसूचीवर आधारित आहे. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू यांचे कार्यक्षेत्रातील डोंगारी, ता.तलासरी, जि.ठाणे येथील शासकीय आश्रमशाळेच्या एकूण रु.५,६५,९४७/- (रु. पाच लाख पासष्ट हजार नऊशे सत्तेचाळीस फक्त) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास खाली दर्शविल्याप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| शासकीय आश्रमशाळेचे नांव | कामाचे नाव | अंदाजपत्रकाची रक्कम |
|---|---|---|
| डोंगारी, ता.तलासरी, जि.ठाणे | दोन नवीन वर्ग खोल्या बांधणे | रु.५,६५,९४७/- |
| | | **एकूण** रु.५,६५,९४७/- |

४. सदर काम सुरु होण्यापूर्वी व झाल्यानंतर त्याचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे.

५. सदर बांधकामाचा खर्च सन २००९-१० साठी मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र.विपअ-१००१/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै, २००१ मधील भाग-पहिला, उपविभाग-५, अ.क्र.१ व सार्वजनिक बांधकाम विभाग, नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००१०८१८३२४१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गी.मो.चांदे)
अवर सचिव

**प्रति,**

महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, डहाणू.
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग. जव्हार.
उपविभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, तलासरी.
कक्ष अधिकारी (का.६(७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.